(१४ पैकी शासन निर्णय क्र.१०)

**फौजदारी खटल्यातील सिध्दापराध प्रमाण वाढविण्यासाठी उपाययोजना करण्याबाबत.**

**दोषारोप गुणवत्ता तपासणी करता मध्यवर्ती संनियंत्रण समिती स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : डीपीपी-२०१२/प्र.क्र.१०/पोल-१०**

**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, दुसरा मजला,**

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**

**दिनांक : १२ मे, २०१५**

**प्रस्तावना :-**

पोलीस ठाण्यामध्ये गुन्हा नोंद झाल्यानंतर गुन्हयाच्या तपासाअंती न्यायालयात दोषारोपपत्र दाखल केले जाते. तथापि, अशा दोषारोपपत्रामधील पुरावे कायदयाच्या कसोटीवर न उतरल्याने अशा गुन्हयांची दोषारोपसिध्दी होत नाही. शासनाच्या असेही निदर्शनास आले आहे की, आरोपीचा बचाव करण्याचा आरोप किंवा टीका होऊ नये याकारणाकरिता सबळ पुरावा नसतानाही तपासी अधिकारी ब-याच प्रकरणांमध्ये दोषारोपत्र दाखल करतात तसेच, काही प्रकरणांमध्ये तपास पूर्ण झालेला नसतानाही तपासी अधिकारी अर्धवट दोषारोपपत्र दाखल करतात. यासर्व बाबींमुळे दोषारोपसिध्दीचे प्रमाण घटत आहे. सबब दोषारोपसिध्दीचे प्रमाण वाढवून गुन्हेगारीला आळा घालण्याच्या दृष्टीकोणातून दोषारोप गुणवत्ता तपासणी करता मध्यवर्ती सनियंत्रण समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

गुन्हयाचा तपास पुर्ण झाल्यानंतर दोषारोपपत्र न्यायालयात दाखल करण्यापूर्वी एका मध्यवर्ती संनियंत्रण समितीमार्फत (Monitoring Committee) सदर दोषारोपपत्राची गुणवत्ता तपासून घेण्याचा निर्णय सदर शासन निर्णयान्वये घेण्यात येत आहे.

२. सदर मध्यवर्ती सनियंत्रण समितीची (Monitoring Committee) संरचना खालीलप्रमाणे राहील :-

| अ.क्र. | न्याय दंडाधिकारी न्यायालयाकरिता | अ.क्र. | सत्र न्यायालयाकरिता |
|---|---|---|---|
| १ | पोलीस अधीक्षक किंवा पोलीस उपायुक्त यांचा प्रतिनिधी | १ | पोलीस अधीक्षक किंवा पोलीस उपायुक्त यांचा प्रतिनिधी |
| २ | सहाय्यक संचालक | २ | जिल्हा सरकारी अभियोक्ता |
| ३ | तपासी अधिकारी | ३ | तपासी अधिकारी |

३. सर्व पोलीस अधीक्षक व पोलीस उप-आयुक्त यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील पोलीस ठाण्यामध्ये दाखल गुन्ह्यांचा आढावा घेऊन ज्या गुन्ह्यामध्ये अद्याप दोषारोपपत्र दाखल केले गेले नाहीत अशा गुन्ह्यांची स्वतंत्र यादी करावी व उपलब्ध पुराव्याच्या आधारे कायद्याच्या कसोटीवर टिकू शकणा-या गुन्ह्यांचे दोषारोपपत्र न्यायालयात दाखल करण्यापूर्वी सदर दोषारोपांची गुणवत्ता उपरोक्त समितीमार्फत तपासून घ्यावी.

४. ज्या दोषारोपामध्ये समितीला योग्य तो कायदेशीर पुरावा दिसला नाही अशा दोषारोपांची स्वतंत्र यादी करून योग्य ती कारणमीमांसा नमूद करून त्या दोषारोपाबाबत पुढील तपास करणे किंवा अहवाल दाखल करण्याबाबत शिफारस पोलीस अधीक्षक व पोलीस उप-आयुक्त करतील.

५. दोषारोपसिध्दीचे प्रमाण वाढविण्याकरिता उपरोक्त सूचनांचे काटेकोरपणे पालन करून प्रभावी अंमलबजावणीकरिता सर्व पोलीस घटक जबाबदार राहतील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०१५०५१२१७१५४३६३२९ हा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dattatray Santaram Patil

Digitally signed by Dattatray Santaram Patil
DN: CN = Dattatray Santaram Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.05.13 12:32:00 +05'30'

**(द.सं.पाटील)**
**उप सचिव, गृह विभाग,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय मुंबई.
३. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य
४. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन, मुंबई
५. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
६. प्रधान सचिव (अपील व सुरक्षा),गृह विभाग, मंत्रालय मुंबई.
७. प्रधान सचिव व विधी परामर्श, विधी व न्याय विभाग मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, विशेष, मंत्रालय, मुंबई
९. महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई
१०. सर्व पोलीस आयुक्त
११. विशेष पोलीस महानिरीक्षक, सर्व परिक्षेत्र
१२. सर्व अपर पोलीस महासंचालक
१३. सर्व जिल्हाधिकारी
१४. सर्व प्रधान जिल्हा व सत्र न्यायाधीश
१५. सर्व पोलीस अधीक्षक
१६. संचालक, अभियोग, संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१७. मा.राज्यमंत्री (शहरे) यांचे खाजगी सचिव
१८. मा.राज्यमंत्री (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव
१९. उप सचिव (पोल-१०)
२०. सर्व सह सचिव/उप सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
२१. सर्व कार्यासने, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
२२. निवडनस्ती